# तृष्णा : दर्शन आणि बोध

नेमाडेंच्या सर्व टीकेचा परामर्ष घेतल्यानंतर नेमाडेंनी जो मराठी साहित्याचा आढावा घेतलाय त्याकडे आपण वळायला हरकत नाही. मी इथे नेमाडेंच्या टीकेवर भर देण्यापेक्षा एकदंरच देशी चळवळीचा ह्यानिमित्ताने आढावा घेणार आहे. मी इतिहास असे नाव देत नाही; कारण तो लिहायला व्यापक आणि संपूर्ण अभ्यास लागतो, तो माझा झालेला नाही. नेमाडेंचा भर प्रामुख्याने कादंबरी आणि नंतर कविता ह्यावर आहे. नेमाडेंनी कविता हा सर्वोत्कृष्ट वाङ्:मयप्रकार असल्याचे म्हटले आहे. **कविता** ही साहित्यातली अव्दैती कला असल्याने ती अव्दितीय ठरते. कुठलाही भाव व्यापक आणि बारीक असतो. स्थूल आणि सूक्ष्म असतो. कविता ही भावाची सूक्ष्मता, बारीकता अचूक भाषेत आणते. त्यामुळेच कवीला भाषेची अतिशय सूक्ष्म जाण असावी लागते आणि अनुभवाचे सूक्ष्म तपशील अतिशय बारकाव्याने शोधावे लागतात. ह्याउलट कादंबरीकाराला भावाची व्याप्ती आणि स्थूलता भाषेत रूपांतरित करावी लागते. त्यामुळे त्याला भाषेची व्यापक जाणीव असावी लागते. (अर्थात प्रत्यक्षात दोघांनाही दोन्ही प्रकारच्या जाणिवा असाव्या लागतात.) कवी आणि कादंबरीकार हे दोघेच सारखेच थोर असतात. नाटक ही स्वतंत्र कला मी मानतो. त्यामुळे नाटकाचा साहित्यात समावेश मी करत नाही; मात्र नाटकाचा साहित्यिक अभ्यास होऊ शकतो. जसा चित्रपट संगीताचा संगीत म्हणून विचार होऊ शकतो तसाच नाट्यसंहितेचा वाङ्:मयीन अभ्यास शक्य आहे. मी स्वत: प्रायोगिक रंगभूमीवर पीएच. डी. करतो आहे. नाट्यसंहितेवर पीएच. डी. करतो आहे आणि ह्या अभ्यासाला मी सध्या **क्षेत्रीय अभ्यास** असे नाव दिले आहे. नाटक, चित्रपट, नृत्य ह्या व्यामिश्र कला आहेत. त्यांना मी घटना कला (प्रत्यक्ष) मानतो आणि त्यांचा वेगवेगळे समीक्षक संगीत, अभिनय, नृत्य, नेपथ्य, साहित्य ह्या सर्व पातळ्यांवर क्षेत्रीय अभ्यास करू शकतात. त्यामुळेच मी इथे देशी नाट्यसंहितांचा विचार करणार नाही. ह्या आढाव्याआधी मी कलेबाबतच्या काही संकल्पनाचे विश्लेषण करणार आहे ,की जेणेकरून ह्या पुस्तकाला एक पूर्णरूप येईल.

ह्या आढाव्याचा विचार करताना मी वाचकांना विनंती करेन की, त्यांनी पुन्हा मी समाजाचे विश्लेषण करताना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, दलित जाणिवांचे ह्यापूर्वी केलेले विवेचन पाहावे, त्यानंतर मी जातिव्यवस्थेविषयी केलेले विवेचन पाहावे. अमूर्त अप्रत्यक्ष, समूर्त प्रत्यक्ष, अमूर्त अप्रत्यक्ष आणि समूर्त प्रत्यक्ष हे ज्ञानाचे चार प्रकार व त्यातून जन्मलेली स्पिरीच्युल इंजिनिअरिंग,

ह्युमन इंजिनिअरिंग मटेरियॅलिस्टिक इंजिनिअरिंग आणि ॲप्लाईड इंजिनिअरिंग ही तंत्रज्ञाने ह्यांचे विवेचन पाहावे.

व्यक्तींनी केलेल्या, घडवून आणलेल्या सर्व घटना ह्या तृष्णांतून घडत असतात. ह्या तृष्णाचे आकलन झाल्याशिवाय कुठलाही साहित्यिक साहित्य निर्माण करू शकत नाही; म्हणून प्रथम आपण ह्या तृष्णांचा विचार करू.

हे विश्व म्हणजे आहेचा आहेशी चाललेला सतत संभोग. आहेची आहेशी चाललेली सततची रतिक्रिडा म्हणजे ह्या विश्वातील क्रिया होय. हे आहे अनंत आहे, आनंदरूप आहे, चितरूप आहे. **आहेला आहेची जाणीव व्हायची असेल तर आहे हे मितिरूपात असावे लागते. म्हणूनच आहे स्वत:ला भोगण्यासाठी अवकाश, काळ आदी मितीत आकार धारण करते.** त्यातूनच स्त्री, पुरुष, झाड, पक्षी अशी अनंत मितिके अस्तित्वात आलेली दिसतात. ही मितिके म्हणजे आहेने मितीत धारण केलेला सांत आकार असतो. ही प्रक्रिया मात्र नृत्यासारखी असते. नृत्य आणि नर्तक जसे वेगळे काढता येत नाहीत तसेच ही मितिके आणि आहे वेगळे काढता येत नाही. ईश्वराचा खरा अर्थ जे शाश्वत आहे ते ! आहे शाश्वत आहे म्हणूनच आहे ईश्वर आहे. ह्याउलट आहेची मितिकरूपे ही नश्वर आहेत. आहे सतत नर्तन करत असते, म्हणून आहे सतत बदलत असते. उपनिषदांनी आहे च्या 'आहे' रूपाकडे पाहिले तर बुध्दाने आहेच्या मितिकरूपाकडे पाहिले. आहेचा आहे मागे कुणी कर्ता आहे हे आपल्याकडे जैन, बौद्ध ह्या धर्मांनी नाकारले आहे. **ब्राह्मण धर्माने (वैदिक)** व भक्तीने मात्र कर्ता मानला आहे आणि त्याला परमात्मा, ईश्वर म्हटले आहे. माझ्या मते ईश्वर ज्या अर्थाने त्याला ख्रिश्चन गॉड, इस्लाम खुदा वगैरे मानतात त्या अर्थाने अस्तित्वात नाही. ह्याबाबतीतले युक्तिवाद अनेकांनी केले असल्याने ते मी इथे करीत नाही. आहेचे सांत आकार सतत पाल्टत असतात. त्यात स्थिर असा आत्मा वगैरे काही असत नाही. स्मृती हा काहीसा एकमेव स्थिर घटक असतो. **तिच्या तृष्णेसहित समष्टीला 'मन' म्हणतात.** ब्राह्मणांनी मनालाच आत्मा म्हटले होते आणि बुद्धाने ह्या आत्म्याला नकार दिला. त्याने 'आहे'च्या मितिकरूपाला जसे आहे तसे स्वीकारले आणि ह्या मनाच्या संरचनेतून रिक्त होणे म्हणजेच शून्याला उपलब्ध होणे अशी निर्वाणाची व्याख्या केली आहे. मितिकरूपाने आहे अस्तित्वात येते ह्यामागे 'आहे'ला आहे भोगावेसे वाटते हे कारण नाही. कारण हे कारण सहज आहे व नर्तकाबरोबर नृत्य अस्तित्वात असते तसेच आहेबरोबर क्रिया आस्तित्वात आहेच. 'आहे' हे हया अर्थाने क्रियायुक्त आहे. आहेची क्रिया आहेपासून वेगळी काढता येत नाही. असणे आणि क्रिया करणे ह्या दोन भिन्न गोष्टी नाहीत. 'आहे' क्रिया करतच असत असते.

प्रत्येक मितिकात 'आहे' सांत असते. हे सांत 'आहे' भोवतालच्या अनंत 'आहे'ला भोगण्याचा उत्सव साजरा करण्याची धडपड करते. 'आहे'ने 'आहे' भोगणे हा निखळ आनंद असतो आणि ह्यातूनच 'आहे'ची 'आहे' भोगण्याची तृष्णा निर्माण होते. कारण सांत 'आहे'ला अनंत 'आहे' हे मितींनी बद्ध असल्यामुळे भोगताच येत नाही. म्हणजेच भोगण्यासाठी मिती लागते आणि मितीत आहे आले की अनंत भोग शक्य होत नाही असा हा विरोध असतो. त्यातूनच तृष्णा वाढत जाते आणि **तृष्णेबरोबर सुख आणि दुःख निर्माण व्हायला लागते. बुद्धाने तृष्णा का निर्माण होते ह्याचे समाधानकारक उत्तर दिलेले नाही. म्हणूनच मला ते इथे द्यावे लागले आहे. (बुद्धाने अविद्या** हे कारण दिले आहे ते पुरेसे वाटत नाही. ते वैयक्तिक आहे.)

मितिकाला अनंत 'आहे' भोगायचे असेल तर स्वतःचे मितिकरूप प्रथम टिकवावे लागते आणि त्यातूनच प्रथम **सुरक्षिततेची** तृष्णा निर्माण होते आणि ही सुरक्षितता नसली की 'आहे' नष्ट होण्याचे भय वाटू लागते. त्याचबरोबर अनंत 'आहे' भोगण्यासाठी भोवतालच्या 'आहे'वर कब्जा मिळवणे व कब्जा मिळवल्यानंतर आपल्या 'आहे'चा त्या 'आहे'त विस्तार करणे त्याला आवश्यक वाटते. ह्यातूनच **संपादनाची व सत्तेची तृष्णा निर्माण होते.** आपले 'आहे'चे रूप (मितिकरूप) कायम टिकवण्याच्या धडपडीतून '**काम**' ही तृष्णा निर्माण होते. भोवतालच्या अनंत 'आहे'वर कब्जा मिळवायचा असेल तर 'आहे' काय **आहे** ते जाणून घ्यावे लागते. ह्यातून **जिज्ञासा** (जाणून घेण्याची तृष्णा) ही तृष्णा निर्माण होते. भोवतालचे आहे (अन्न) आपल्या पोटात सामावून घेणे टिकण्यासाठी आवश्यक असते; पण त्यासाठी ते आहे जसे आहे तसे स्वीकारता येत नाही. त्यात बदल करावे लागतात, त्याचा कायापालट करावा लागतो. ह्यातून **कायापालटीची** सृजनाची तृष्णा निर्माण होते. मितिक सांत असते. त्याची ऊर्जाही मर्यादित असते आणि ज्याच्यावर कब्जा मिळवायचा ते आहे तर अनंत असते. त्यामुळे त्याला कमीत कमी ऊर्जा खर्च करून अधिकाधिक अनंत आहे भोगायचे असते. आजचे आधुनिक विज्ञान व तंत्रज्ञान हे ह्या तृष्णेतून निर्माण झाले आहे. हिला '**आराम**' करण्याची तृष्णा म्हणता येईल. अनेकदा भोवतालचे मितिक सामावून घेण्यासाठी त्याला ठारच मारावे लागते. टिकण्यासाठी ते आवश्यक असते. ह्यातून '**हिंसा**' ही तृष्णा निर्माण होते. (उदा. मांसाहार).

मितिकांचे विशेषतः मानवाचे बालपण हे अनेकदा संगोपनासाठी इतरांच्यावर अवलंबून असते अगदी रासायनिक पातळीवर **एकमेकाच्या इलेक्ट्रॉनची वापरावापरी चालूच असते.** ह्यातूनच **स्नेहाची** तृष्णा निर्माण होते. स्वतःच्या मितिकरूपातून आपल्यासारखेच मितिकरूप निर्माण करण्यासाठी अनेकदा दुसऱ्या मितिकाची गरज असते. नर आणि मादी एकमेकात विसर्जित

झाल्याशिवाय पुनरुत्पादन निर्माणच होऊ शकत नाही. ह्यातूनच **प्रेमाची** तृष्णा निर्माण होते. काही मितिकात केवळ कामाची तृष्णा असते. कारण त्यांना पुनरुत्पादनासाठी दुसऱ्या मितिकाची गरज भासत नाही. काही मितिकात विशेषतः मानवात ही गरज तीव्र असते. म्हणूनच मानवात काम आणि प्रेम एकत्र नांदतात. कामात दुसऱ्या मितिकाचा केवळ वापर असतो तर प्रेमात दोन्ही मितिके एकमेकात विसर्जन करतात. विसर्जनाशिवाय प्रेम अस्तित्वात येऊ शकत नाही. स्वतःचे मितिकरूप भोवतालच्या अनंतात विसर्जित करण्याची तृष्णा म्हणजे **भक्ती** होय. इथे भोवतालच्या अनंत आहेवर कब्जा मिळवण्याऐवजी आपणच त्या अनंतात विसर्जन करण्याची तृष्णा असते. सत्ता आणि संपादन ह्या तृष्णांच्या नेमक्या विरोधी ह्या तृष्णा आहेत. दोन्हीकडे अनंत प्राप्त करण्याची धडपड आहे. पण एकात कब्जा करण्याचा प्रयत्न आहे तर दुसऱ्यात विसर्जन आहे.'आहे' आहेला भोगते ते उत्सवासाठी, आनंद अधिक द्विगुणित होण्यासाठी. सांत आहेतही ह्याचेच रूपांतर आनंदसुख प्राप्त करण्याच्या तृष्णेत होते. ह्या तृष्णेला '**आनंदसुख**' असेच नाव आपण देऊ. अलीकडे संभोगात अनेकदा ही आनंदसुखाचीच तृष्णा वर्चस्व ठेवून असते. माणूस पुनः पुन्हा आनंदाची उजळणी व्हावी म्हणून धडपडतो आणि आनंदाला पारखा होतो. अनेकदा भोवतालचे 'अनंत आहे' कब्जात यावे म्हणून दोन किंवा त्याहूनही अधिक मितिके आपापसात साहचार्य करतात. ह्यामागे स्नेह आणि संपादन अशा दोन्ही तृष्णा असतात. ह्यातून कळप निर्माण होतो. कळप हा अशा अनेक मितिकांचा समूह होय. मानवी कळप म्हणजे माणसांचा समूह होय. ह्या कळपात गिव्ह ॲण्ड टेक ह्याच तत्त्वावर आधारित काम चालत असते. हे काम अधिक आरामदायकपणे व्हावे म्हणून माणूस कायदा, नीती वगैरे नियंत्रणे निर्माण करतो. ह्यामागे 'आराम' हीच तृष्णा असते.

मानवाच्या सर्व कृतीमागे ह्या तृष्णा असतात. समाजाच्या सर्व कृतीमागे सामूहिक तृष्णा **(Collective Trishna)** असतात. ह्या सर्व तृष्णा शरीराशी प्रकर्षाने निगडित असल्याने त्या जनुकामधून (genes) एका पिढीकडून दुसऱ्यां पिढीकडे संक्रमित होतात. ह्या तृष्णांचा मृत्यू म्हणजे महानिर्वाण होय. **ह्या मृत्यू केवळ ध्यानानेच शक्य होतो.** भक्ती जोपर्यंत तृष्णा असते तोपर्यंत तिचा निर्वाणाला किंवा मोक्षाला काडीचाही उपयोग नसतो; पण तिचे रूपांतर ध्यानात होताच ती निर्वाणाप्रत घेऊन जाऊ शकते. **मन म्हणजे तृष्णा आणि स्मृती यांचा संघात होय.** ह्यातील तृष्णांचा नाश झाला की स्मृती हे केवळ खेळणे बनते; अन्यथा ह्या स्मृती तृष्णांना हव्या तशा नाचवतात तर कधी तृष्णा स्मृतींना हव्या तशा नाचवतात आणि मितिक स्वतःचे स्वातंत्र्य गमावून बसते. ह्या तृष्णा आणि स्मृती यांची संरचना प्रत्येक व्यक्तीची अतिशय

वेगवेगळी असते. म्हणूनच प्रत्येकाचा तृष्णांचा मृत्यू घडवण्याचा मार्ग वेगवेगळा असतो. कोणत्या तृष्णांचा मृत्यू घडवायचा हे साधारणपणे सहज कळते. पण कसा घडवायचा ह्याबाबत मतभेद होतात. बुद्ध ज्या मार्गाने तृष्णाचा मृत्यू घडवतो त्यामार्गाने महावीर गेलेला नसतो. तुकाराम वेगळाच मार्ग अनुसरतो तर कृष्णमूर्ती आणखी वेगळ्याच मार्गाने जातात; कारण प्रत्येकाची स्मृती वेगळी असते. ही स्मृती केवळ त्या व्यक्तीची नसते तर ती ज्यांच्या पोटी जन्मते त्यांच्या जनुकामधून तिच्या संरचनेचा काही भाग आलेला असतो, म्हणूनच Meditation is path-less असे म्हणावे लागते. बुद्धही उपदेश करताना म्हणतो, 'तुमच्या मार्गात जर बुद्ध आडवा येतोय असे वाटले तर बुद्धालाही कापून काढा'. तृष्णेचे वरकरणी गुप्त, सुप्त आणि प्रकट असे तीन स्तर वरवर पाहता वाटतात. पण प्रत्यक्षात तृष्णा ही एकच असते. ह्या तृष्णांचा मृत्यू घडवायचा असेल तर खालील गोष्टी कराव्या लागतात.

**(१) काम ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी ब्रह्मचर्य (२) हिंसा ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी अहिंसा (३) संपादन ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी अपरिग्रह (४) आराम ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी अस्तेय (५) प्रेम, स्नेह ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी करुणा (६) जिज्ञासा व कायापालटीच्या तृष्णेच्या मृत्यूसाठी सत्य बोलणे, आपण जसे आहोत तसे जगणे आणि स्वतःशी प्रामाणिक असणे (थोडक्यात मुखवटा आणि अभिनय टाळणे, प्रतिमेतून मुक्त होणे) (७) भक्ती ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी ध्यान (८) आनंदसुख ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी तृष्णेचा मृत्यू व्हावा ह्याही तृष्णेचा मृत्यू (९) सुरक्षितता ह्या तृष्णेच्या मृत्यूसाठी मी क्षणिक आहे हे आत्मज्ञान.**

ह्या तृष्णांचा मृत्यू कसा घडवायचा, ब्रह्मचर्य, सत्य वगैरेंना कसे उपलब्ध व्हायचे हा प्रत्येकाचा प्रश्न असतो आणि तो ज्याचा त्याला वैयक्तिक पातळीवर सोडवावा लागतो. कारण प्रत्येकाची स्मृती व तृष्णा यांची संरचना वेगवेगळी असते. प्रत्येकाचे संस्कारण वेगळे असते. प्रत्येक मानवाला तृष्णांची तृप्ती हवी असते. मोक्ष किंवा निर्वाण कुणालाच नको असते. म्हणूनच जगात बुद्ध निर्माण होत नाहीत. ह्याबाबत बुद्धाची एक कथा सर्वश्रुत आहे. बुद्धाजवळ एक तरुण आला आणि त्याने विचारले, 'जगात बुद्धांची संख्या जवळ जवळ शून्य आहे याचे कारण काय ?' बुद्धाने त्याला उत्तर न देता एक काम सांगितले. बुद्ध म्हणाला, 'तुझ्या गावात जा आणि कुणाकुणाला काय हवे आहे त्याची नोंद कर'. तो तरुण गेला आणि गावात त्याने प्रत्येकाला त्याला काय हवंय ते विचारले. कुणाला प्रासाद, कुणाला सुंदर तरुण किंवा तरुणी, कुणाला श्रीमंत पती असेच काहीबाही हवे होते. बुद्धाने तो परतल्यावर त्याला विचारले, 'बाबा रे, तुझ्या गावात

कुणाला निर्वाण हवे आहे का ?' तरुण खेदाने म्हणाला, 'नाही'. बुद्ध शांतपणे म्हणाला, 'बाबा रे, म्हणूनच कुणाला निर्वाण मिळत नाही. म्हणूनच जगात बुद्ध कमी आहेत. तेव्हा जगात बुद्ध का होत नाहीत ते विचारू नकोस. तुला निर्वाण हवे आहे की नको ते स्वतःला विचार आणि हवे असेल तर अष्टांग मार्ग अनुसर.'

ह्या तृष्णांच्या पूर्तीसाठीच माणूस साहचर्य आणि संघर्ष करतो. ह्या तृष्णा जगातून नाहीशा होणे शक्यच नाही म्हणून संघर्ष आणि साहचर्य अटळ आहेत. आपण फक्त आपल्या तृष्णांचा मृत्यू घडवून आणू शकतो. जर प्रत्येकाने तृष्णांचा मृत्यू घडवला तरच जगातील संघर्ष संपेल; पण हे कधीकाळी घडेल ह्यावर माझा तरी विश्वास नाही. मात्र मी माझ्यापुरता तृष्णांचा मृत्यू घडवून आणू शकतो. प्रत्येक व्यक्ती स्वतःच्या तृष्णांचा मृत्यू घडवून आणू शकते, स्वतःच्या जीवनातील संघर्ष नष्ट करू शकते आणि प्रत्येकाने त्या दृष्टीने प्रयत्न करावा हे उत्तम. स्वतःच्या तृष्णांचा मृत्यू घडवून आणायचा नाही आणि समाजाची सामूहिक तृष्णा नष्ट करायचा प्रयत्न करायचा किंवा तृष्णांचा विचार न करता समाजात क्रांती व परिवर्तन घडवून आणून संघर्ष नष्ट करायचा प्रयत्न करायचा हा एक बकवास आहे. पाश्चात्त्यांनी हा गाढवपणा खूपदा केला आहे. तेव्हा तो आपण केलाच पाहिजे असे नाही. आपण व्यक्तीत क्रांती करण्याचा प्रयत्न करावा हे उत्तम आणि ह्यासाठी जर शासन विरोध करत असेल तर शासनाच्या विरोधात जावे. तृष्णांची उपेक्षा करून घडवलेले कोणतेही परिवर्तन हे क्षणिकच ठरेल. परिवर्तनाचा केंद्रबिंदू व्यक्तीच असली पाहिजे आणि प्रत्येक व्यक्तीने आपल्या तृष्णांचे भान राखत इतरांच्या तृष्णांविषयी बोलावे हे उत्तम. मात्र ह्यासाठी स्वातंत्र्य, अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण ह्या गोष्टी आवश्यक आहेत हे ध्यानात घ्यावे. त्यादृष्टीने शासनावर दडपण असणे आवश्यक आहे. असो.

ह्यातील प्रत्येक कळपाच्या सामूहिक तृष्णा वेगवेगळ्या आहेत तर अनेकदा प्रत्येक कळपाची तृष्णा समान; मात्र ती भागवणाऱ्या काही मितिकांचा पुरवठा मात्र मर्यादित असतो. त्यामुळे अनेकदा कळपाकळपांची युद्धे जुंपलेली दिसतात. भांडणे लागलेली दिसतात. 'आहे' रूपांतरित करून त्यापासून उपयुक्त मितिके बनवण्याचा ध्यास प्रत्येक व्यक्तीला आणि प्रत्येक कळपाला आहे. आहेची काही विशिष्ट मितिकरूपे मर्यादित आहेत. उदा. तेल ह्या मितिकरूपाबाबत हा संघर्ष अधिक तीव्र झालेला दिसतो. मुख्यतः आहेचे वनस्पतीरूप, वातावरण रूप पूर्णपणे धोक्यात आले आहे आणि आहे रूपांतरित करण्याची आपली तृष्णा मात्र काही केल्या संपत नाही. बहुधा जोपर्यंत मानवाला स्वतःच नष्ट होण्याचे भय वाटत नाही तोपर्यंत पर्यावरणाची ही रूपांतरे अटळ आहेत.

'आहे' रूपांतरित करण्यासाठी लागणारी चार प्रकारची ज्ञाने आणि चार जाणिवा यांची चर्चा मागे केली आहेच. ब्राह्मण जाणीव ही संपूर्ण आहेशी निगडित आहे आणि त्यामुळेच तिचे ज्ञान हे अमूर्त अप्रत्यक्ष असते. कारण अनंत आहे हे प्रत्यक्षात कधीच अनंत आहे ह्या स्वरूपात नसते, तर अनंत सांत रूपात असते. क्षत्रिय जाणीव ही सांत रूपाशी मितिकांशी (मानवाशी) निगडित असते; मात्र ह्या अमूर्त प्रत्यक्ष ज्ञानाचे तोंड अनंत आहेकडेच वळलेले असते. वैश्य जाणीव सांत मितिकाशी निगडित असते. इतकेच नव्हे तर ती सांताच्या अधिकाधिक खोल जाण्यात यशस्वी होते. तिचे ज्ञान प्रत्यक्ष असते. ती अनंत आहेचा विचार प्रत्यक्ष प्रमाणावर करते. तिचे ज्ञान समूर्त अप्रत्यक्ष असते. दलित जाणीव व वैश्य जाणीव ह्या आहेचा इथलाच विचार करतात, तर ब्राह्मण जाणीव ही नेहमीच इथे नसलेल्या स्वर्गाचा विचार करते.क्षत्रिय जाणीव इथे कसा स्वर्ग आणता येईल ह्याचे स्वप्न रंगवत असते किंवा दाखवत असते. त्यामुळेच ह्या दोन्ही जाणिवा मानवाला अनेकदा काहीच न देता त्याचे शोषण मात्र करत राहतात. वैश्य जाणिवेचा व्यवहार व दलित जाणिवेचा व्यवहार हा प्रत्यक्ष असल्याने त्यांना स्वर्ग इथे आणि इथेच निर्माण करावा लागतो. समाजातले सर्वांत मोठे आश्चर्य जे प्रत्यक्षात समाजाला काहीच देत नाहीत, जे केवळ दुसऱ्यांचा प्रतिभेवर चरत असतात आणि केवळ अभिनय करत असतात अशा राजकारणी आणि अभिनेता-अभिनेत्री ह्या दोन घटकांना समाज वारेमाप प्रसिद्धी, पैसा, सन्मान देतो आणि बिचाऱ्या वैज्ञानिक, तंत्रज्ञ, उद्योगपती, कामगार जे प्रत्यक्षात समाजात काहीतरी निर्माण करत असतात त्यांना समाज अजिबात प्रसिद्धी व सन्मान देत नाही. समाजाची कळंप म्हणून बुद्धी काय दर्जाची आहे ते ह्यावरून स्पष्ट व्हावे. चित्रपटामागची खरी प्रतिभा लेखक, दिग्दर्शकाची असते किंवा राजकीय, आर्थिक, सामाजिक धोरणामागे खरी प्रतिभा वैज्ञानिक, अर्थतज्ज्ञ वगैरे मानव्य वैज्ञानिक यांची असते आणि खरा मानसन्मान व प्रसिद्धी त्यांना दिली पाहिजे, ह्या साध्या साध्या गोष्टी जोपर्यंत समाज व समाजातील प्रसिद्धी माध्यमे शिकत नाहीत तोपर्यंत समाजाला '**जन्नत के ख्वाब ने मार डाला**' असेच म्हणायची पाळी येणार. एका अर्थाने समाज आजही ब्राह्मण जाणिवेच्या प्रभावाखालीच आहे. पूर्वी ब्राह्मण मंत्र, तंत्र, यज्ञ, कर्मकांडे ह्यातून सर्वांना दिलासे विकायचे आणि आज राजकारणी व अभिनेते व्यक्तीला व कळपाला असेच स्वर्गाचे दिलासे दाखवणारे दलाल म्हणून काम करतात. फक्त हे स्वर्ग आता पडद्यावर व भाषणात साकारतात एवढेच. ब्राह्मणांनी स्वर्गासाठी म्हटलेले मंत्र व राजकारण्यांची भाषणे ब्राह्मणांची कर्मकांडे व अभिनेत्यांच्या भूमिका (भूमिका नेहमीच कर्मकांडात्मक भारलेले अभिमंत्रित वातावरणच घेऊन जन्मत असतात) ह्यात काहीही फरक नाही. पूर्वी ब्राह्मण आणि

राजा भूदेव होते. आजकाल अभिनेते-अभिनेत्र्या व राजकारणी भूदेव-भूदेवता बनलेल्या आहेत आणि लोक त्यांना नमस्कार करतच आहेत. पैसे देतच आहेत.

भारतीय संरचनेत ह्या जाणिवा जातीशी निगडित ठेवल्या होत्या. त्यातून भारतीय समाज (भारतीय समाज म्हणजे वेगवेगळ्या जातींच्या कळपांची गर्दी होय.) हळूहळू बाहेर पडत आहे; पण तरीही ह्यांचा संस्कार अद्यापही ठोस दिसतो आहे. उदाहरणार्थ, पूर्वीपासून ब्राह्मण ही जात मंत्रावर, पाठांतरावर, कर्मकांडावर जगत होती. आज या जातीने आपले पारंपरिक व्यवसाय फेकले, पण जे व्यवसाय स्वीकारले ते मौखिक आहेत. शिक्षण, लेखन, अभिनय, निवेदन, गायन, वकिली, डॉक्टरी आदी सर्व पेशे मौखिक आहेत. त्यांतील डॉक्टरी हा ब्राह्मणांचा मौखिक नसलेला व्यवसाय होता. शिक्षण, अभिनय, गायन, वकिली सर्व ठिकाणी पाठांतर, ज्ञान लागते किंवा कारकुनकीचा आणि प्रशासकीय अधिकारी म्हणून पूर्वी काम करत तोच व्यवसाय आजही ही जमात चालवत आहे. पूर्वीही ह्या जमातीचा प्रत्यक्ष वस्तुस्थितीशी फार कमी संबंध होता. पूर्वीही हे लोक पुस्तकी होते आणि आजही पुस्तकीच आहेत. अलीकडची पिढी हळूहळू हा पुस्तकीपणा घालवत आहे. पण त्यातून प्रत्यक्ष ज्ञाननिर्मिती मात्र साधलेली दिसत नाही. आजही ह्या लोकांना मार्क्स, वेबर, बार्थ हातात घेतल्याशिवाय भारतातल्या वस्तुस्थितीवर बोलणे जिवावर येते.. मधल्या काळात 'दास कॅपिटल' नावाच्या नव्या वेदाकडे हे लोक वळले होते व त्यातून त्यांनी पुस्तकी राजकारणच खेळलेले दिसते.

इथल्या क्षत्रियांची गोष्टही वेगळी नाही. पूर्वीही ही जमात जमिनीची सत्ता मिळवण्याच्या मागे होती. आजही राजकारण खेळत आहे. भूखंड बळकावत आहे, विकत आहे. पूर्वी चौथाई सरदेशमुखी वसुली करायचे. हल्ली भूखंड व बिल्डिंगा बांधणे, धरणे-कालवे बांधणे, शेती करणे व शेती मालाशी निगडित सहकारी साखर कारखाने, दारूचे कारखाने उभे करणे, रस्ता बांधणे, जंगले तोडणे, पशुपालन, दुग्धवयवसाय वगैरे वगैरे सर्व गोष्टी ज्या पूर्वी ह्यांच्या ताब्यात होत्या त्याच चालू आहेत: पूर्वीही हे लोक भ्रष्ट होते. आज अधिकच भ्रष्ट झाले आहेत. राजकारण व प्रशासन ह्यांच्या ताब्यात होते. आजही आहे.

वैश्य - ह्यात वैश्यांपासून जैन, पारशी, मारवाडी, सिंधी सर्वच येतात - पूर्वीही दलाली करत. शेतमाल विकत. बळकावत. आज ही जमात उद्योगधंदे व व्यापार आपल्या ताब्यात ठेवून आहे. भारतातल्या वैश्यांत भांडवलदार बनण्यासाठी लागणारी प्रतिभा फारशी आढळत नाही. टाटा-बिर्लासारखे अपवाद. पण एकंदरच अनुकरण जास्त. त्यामुळे कोलॅबरेशन जास्त चालते. कारण भारतीय वैश्य शिक्षणाला गेली अनेक शतके पारखा होता. आता नवीन वैश्य मात्र तंत्रज्ञानात

पाऊल ठेवतो आहे; पण एकंदरच आमचा वकूब कमी. पूर्वी तर ह्या लोकांनीही इथल्या लोकांचे प्रचंड शोषण केले, अफरातफरी केल्या. आजही ह्या भ्रष्ट वृत्तीत फरक पडलेला दिसत नाही. मुख्य म्हणजे **भारतीय वैश्यांचा भर उत्पादनावर कमी व वितरणावर जादा होता.** आजही भारतीय वैश्य परदेशी मालाचे केवळ वितरणच करताना दिसतो किंवा जे उत्पादन करतो त्यात पाश्चात्त्यांचे सहकार्य असते. स्वतःचे तंत्रज्ञान निर्माण करण्यात भारतीय वैश्य पूर्ण अपयशी झाला. कारण परंपरागतच वितरण करण्याची लागलेली घाण सवय. भारतीय वैश्याइतका आळशी आणि ऐतखाऊ वैश्य समाज जगाच्या पाठीवर कुठेच नसेल. पूर्वी हे लोक केवळ दलाल होते. आजही ह्या दलालीतून बाहेर पडलेले दिसत नाहीत. ब्राह्मण क्षत्रियांनी लाच घ्यायची आणि वैश्यांनी ती द्यायची ही पद्धत ह्या देशात फार प्राचीन काळापासून सुरू आहे. तिघांनीही ती खंडित केलेली नाही. क्षत्रिय नेहमीच उपकार केल्यासारखा आव आणत आणि वैश्यांना व्यापाराची परवानगी देत आणि वैश्य तातापुता करत त्यांचे पाय चाटत व्यापार करत. त्यांना हिस्सा देत. आजही दोघे इमानेइतबारे आपली भूमिका पार पाडताना दिसतात. ह्यामागची संरचना अधिक नीट पाहिली तर लक्षात येते की, प्रत्यक्ष उत्पादक असणाऱ्या लोहार, सुतार, शेतकरी यांना भारतीय जातीव्यवस्थेत शूद्रांचा दर्जा दिला गेलाय त्यामुळेच उत्पादनाविषयी आजही आदर नाही. उत्पादक शूद्र आणि वितरक वैश्य अशी ही विचित्र उतरंड आहे त्यामुळेच भारतात उत्पादकापेक्षा आजही वितरक जास्त कमावतात. वैश्यांना व शूद्रांना उत्पादन करणे व वितरण करणे हा आपला हक्क आहे हे जोपर्यंत पटत नाही तोपर्यंत हे असेच चालणार.

अतिशूद्र पूर्वीही ह्या समाजाची सेवा करायचे. आजही फार फरक पडलेला नाही. सवलतीमुळे ह्यांना उच्च सेवेच्या जागा मिळाल्यात एवढेच; पण सेवा करणे ह्या व्रतात फारसा फरक पडलेला दिसत नाही. सवलतीचे गाजर आश्चर्यकारकरीत्या पुंगीसारखे ह्या समाजासमोर वाजत असल्याने त्याचा पुरेपूर फायदा इथले उच्चवर्णीय उठवताना दिसतात आणि हाही वर्ग तसा अलिकडे बनेल व इरसाल बनल्याने अधिकाधिक सवलती उपटण्याच्या मागे लागला आहे. क्षत्रियांनी ब्राह्मणांना रिप्लेस करण्यासाठी शूद्रांचा अतिशूद्रांचा सर्रास वापर करायला सुरुवात केली आहे आणि अतिशूद्रांना आपली प्लेसमेंट अशी रिप्लेसमेंटने हवीच आहे. पूर्वी पंचायतीत एक **महार पंच** असायचा. अलीकडे मंत्रिमंडळात रामदास आठवले वगैरे लोक असतात. शूद्र त्यांचे छोटे छोटे व्यवसाय, छोटी जमीन सांभाळत आहेत. शूद्र आणि अतिशूद्र एकत्र येऊन एक प्रचंड दबावगट निर्माण होईल असे चित्र आज दिसत आहे. हा दबावगट वैश्यांच्या वैद जाणिवेकडे झुकणार की क्षत्रियांच्या क्षत्रिय जाणिवेकडे झुकणार ह्यावर ह्या देशाचे भवितव्य अवलंबून आहे. जागतिक

कल वैद जाणिवेचा आहे; मात्र भारतीय वैश्य, वैद जाणिवेचे नेतृत्त्व करायला पुढे यायला तयार नाही. भारतीय वैश्यांना अद्याप वर्तमानपत्राची साखळी निर्माण करता आली नव्हती ती अलीकडे जरा निर्माण होताना दिसते आहे; पण वैश्यांचे राजकीय नेतृत्त्व करू शकेल व शूद्र अतिशूद्र ह्यांनाही घेऊन जाऊ शकेल असा नेता आजतरी दिसत नाही. किंबहुना वैश्यांनी असा काही विचार केलाय असेही दिसत नाही. समाजवादामुळे सतत पडती भूमिका घ्यायची वैश्यांना जी सवय लागलेय ती अद्याप सुटलेली नाही. मात्र लवकरच वैश्यांना आक्रमक भूमिका घ्यावी लागेल असे वाटते. त्यासाठी शूद्र अतिशूद्रांच्यात विश्वास निर्माण करावा लागेल. यातील शूद्र हे तर मूळचे वैश्यच आहेत. त्यामुळे ते वैश्यांना येऊन मिळाले तर फारसे आश्चर्य वाटणार नाही. थोडक्यात, भारतीय कळपाच्या व्यवस्थेतही त्या त्या कळपांची सामूहिक तृष्णा (Collective Trishna), आणि सामूहिक संस्कारण (Collective Conditioning) महत्त्वाचे कार्य करत होते, आहे आणि असणार. व्यक्तीचे भवितव्य वैयक्तिक तृष्णा (Individual Trishna), सामूहिक तृष्णा (Collective Trishna) आणि वैश्विक तृष्णा (Universal Trishna) ह्या तृष्णांवर आणि वैयक्तिक संस्कारण (Individual Conditioning), सामूहिक संस्कारण (Collective Conditining) आणि वैश्विक संस्कारण (Universal Conditioning) ह्यावर अवलंबून होते, आहे आणि असणार. पूर्वी वैश्विक तृष्णा आणि वैश्विक संस्कारण यांचे स्थान दुय्यम होते. आता ते फारच महत्त्वाचे बनल्यानेच **देशीवाद** आज **मागासलेला वाटतो.**

मानवाच्या सर्व कृतीमागे ज्या तृष्णा आहेत त्याच तृष्णा कलाकृतीमागेही आहेत. सर्व कलाकृती ह्या ह्याच तृष्णांतून निर्माण होतात. देशी चळवळीचे साहित्य ह्याला अपवाद नाही. त्यामुळे ह्या तृष्णांचा आणि कलेच्या निर्मितीचा संबंध आपण पाहू.

**संपादन** : कलाकृतीद्वारे कलावंत जे आहे ते कलात्मक पातळीवर संपादन करू इच्छितो. आहेचे जे रूप आहे ते प्रत्यक्ष संपादन करणे शक्य नसते. कलावंत ते कलाकृतीत संपादन करतो. कीर्ती हा असाच मानसिक संपादनाचा प्रकार असतो. आहेच्या मानसिक अस्तित्वावर प्रभुत्व मिळवणे हीच तृष्णा कीर्तीमागे असते. कलावंत ह्या कीर्तीसाठी कलाकृती निर्माण करतो.

**सत्ता** : संपादनात प्रभुत्व येते तर सत्तेत स्वतःच्या आहेचा संपादन केलेल्या आहेत विस्तार करण्याची तृष्णा असते. एका अर्थाने सांत देहापलीकडे जाऊन अनंत बनण्याचीच ही तृष्णा असते. कलावंताचा जीवनानुभव हा त्याच्या आहेचाच भाग असतो. ह्या जीवनानुभवाचा रसिकाच्या मनात विस्तार करण्याची तृष्णा

कलावंतात असते, म्हणून कलावंत कलाकृती निर्माण करतो.

**सुरक्षितता** : क्वचित स्वतःचे अस्तित्व टिकवण्यासाठी कलावंत लेखन करतो. अनेकदा कलावंताची समीक्षा ह्या तृष्णेतून निर्माण होते. स्वतःच्या कलाकृतीच्या रक्षणासाठी ही समीक्षा लिहिली जाते किंवा समीक्षेवर हल्ले होतात. काही वेळा आपले नाव, प्रसिद्धी, प्रतिमा टिकावी म्हणून लेखन केले जाते, त्यामागे हीच तृष्णा असते. अनेकदा एखादी मूल्यव्यवस्था किंवा संस्थारूप किंवा स्मृती टिकावी म्हणून लिखाण होते.

**जिज्ञासा** : हे आहे काय आहे, किती आहे, काय करते हे जाणून घेण्याची तृष्णा कलावंत आणि रसिक ह्या दोघांच्यातही असते. ह्या आहेची व्यवस्था लावल्याशिवाय जगणे शक्यच नसते. कलावंत त्याच्या जीवनानुभवाची, त्याच्या भोवतालच्या व त्याच्या आतल्या आहेची कलाकृतीत सभावात्मक व्यवस्था लावत असतो, रसिकही हे आहे समजून घेण्यासाठी त्याची सभावात्मक व्यवस्था लावण्यासाठीच कलाकृतीचा आस्वाद घेत असतो. ही व्यवस्था जितकी खोल, व्यापक, दृढ, सूक्ष्म असते तितकी ती कलाकृती अधिक थोर असते.

**काम** : सांत आहे हे शेवटी आहेने बनलेले असते. हे आहे अमर असते. त्यामुळे साहजिकच अक्षर आहेने धारण केलेले मितिकरूप अक्षर अमर राहण्याची धडपड करते. ह्यातून सुरक्षिततेची तृष्णा जन्मते. कोणतेही मितिकरूप सांत असल्याने ते अमर होऊच शकत नाही. अमर राहण्यासाठी अनंत असणे ही आद्य अट असते. ह्यावर उपाय म्हणून सांत आहे पुनरुत्पादन सुरू करते. ह्यातूनच काम ही तृष्णा जन्मते. कामामुळे मितिकाचे मितिकरूप नष्ट झाले तरी अनुवंशिकतेमुळे ते मितिकरूप टिकून राहते. मितिक आपल्यासारखेच मितिक निर्माण करते, ह्यामागे ही अमर होण्याची तृष्णा असते. कलाकृती ही कलावंताची अशीच आपल्यासारखीच मितिक निर्माण करण्याची धडपड असते. कलाकृती निर्माण करून कलावंत अमर होण्याचा प्रयत्न करतो.

**स्नेह** विश्वाची जी व्यवस्था आहे तिचा स्नेह हा मुख्य आधार आहे. मूलद्रव्याच्या पातळीवर इलेक्ट्रॉनमध्ये एकमेकाच्या कक्षा वापरू देणे अशा प्रकारचे साहचर्य आढळते, तर वनस्पती व प्राणी एकमेकांला एकमेकांचे वायू वापरायला देतात. ह्यातूनच स्नेह ही तृष्णा बनते. दुर्दैवाने पाश्चात्त्य देशात डार्विनच्या अर्धवट

शहाणपणामुळे 'बळी तो कान पिळी' असा संघर्षावर एकांगी विश्वास ठेवणारा मार्ग रूजला आणि आज पर्यावरणाचा मोठा प्रश्न निर्माण झाला आहे. प्रत्यक्षात सर्व सृष्टी ही संघर्षापेक्षा अधिक साहचार्यावर आधारित आहे. हायड्रोजन, ऑक्सिजनच्या साहचार्यामुळेच आपण पाणी पिऊ शकतो आणि वनस्पती प्राणवायू सोडतात, म्हणून आपण जिवंत आहोत. मानवाच्या बालपणाचा आधार तर स्नेहच असतो. समाज ही तर साहचर्यावरच उभी राहिलेली संस्था आहे. ह्या साऱ्या साहचर्यामागे स्नेह ही तृष्णा असते. कलेबाबतही मानवाची स्नेह ही तृष्णा कार्यरत असते. एकमेकांचे जीवनानुभव शेअर करण्याच्या तृष्णेतून कलाकृती निर्माण होते. कलावंताला आपला जीवनानुभव अनेक माणसांबरोबर शेअर करावासा वाटतो म्हणूनच कलावंत कलाकृती निर्माण करतो.

**प्रेम** : कलाकृती म्हणजे कलेचे माध्यम आणि कलावंताचे मन ह्यांच्यातील संभोग होय. माध्यम आणि मन यांच्या संभोगातून कलाकृती जन्मते. कोरे अवकाश, कोरा कॅनव्हास, कोरा कागद, कोरी फिल्म, कोरा रंगमंच, कोरी काया हे गर्भाशय असते. कलाकृती ह्या आपत्याची पेशी आणि पेशी कलावंताला तयार करावी लागते. कलावंताला वाटणारे माध्यमाविषयीचे प्रेम, त्याची स्वतःला माध्यमात विसर्जित करण्याची तृष्णा हीच कलाकृतीच्या निर्मितीमागचे एक मुख्य कारण असते.

**कायापालट** : मानवाला भोवतालच्या आहेची काया हवी तशी पालटायची असते. पण हा कायापालट शक्य होत नाही. माणूस स्वप्नात त्याच्या भोवतालच्या आहेचा हवा तसा कायापालट करून ही इच्छा पूर्ण करतो; पण स्वप्न टिकत नसल्याने हा कायापालट टिकत नाही. कलाकृती हा मानवाने त्याला हवा तसा कायापालट कायम रूपात घडवून आणण्याचा शोधलेला अभिनव मार्ग आहे. अनेक मनोरंजनवादी कलाकृतींमागे व आस्वादामागे मानवाची ही कायापालटीची तृष्णा असते. आहेची व्यवस्था लावण्याचा हा एक पलायनवादी मार्ग म्हणून ह्याचा वापर केला जातो. गंभीर लेखक कायापालटीचा वापर गंभीरपणे करतो. कलाकृती म्हणजे कलावंताने निर्माण केलेले टिकाऊ स्वप्न असे म्हणायला हरकत नाही.

**आराम** : कमीत कमी ऊर्जेत अधिकाधिक काम करण्याची तृष्णा ही एक महत्त्वाची तृष्णा आहे. कलाकृती हा कमीत कमी ऊर्जेत अधिकाधिक मानवांपर्यंत जीवनानुभव

(ह्याला आहेनानुभव हा शब्द अधिक योग्य आहे) पोहोचवण्याचा प्रयत्न असतो. काही वेळा आराम देणाऱ्या पैसा, सवलती ह्यांच्या तृष्णेपायी कलाकृती निर्माण केली जाते.

**हिंसा** : भोवतालच्या आहेची काही मितिकरूपे-मग ती संस्थात्मक असतील वा मूल्यात्मक असतील-काही कलावंतांना नको असतात. त्यांना नाहीसे करण्यासाठी किंवा नको असलेला आहेचा भाग कापण्यासाठी कलावंत कलाकृती निर्माण करतो. बहुतेक परिवर्तनवादी लेखकांच्या लेखनामागे ही तृष्णा एक महत्त्वाची तृष्णा म्हणून काम करते. कित्येकदा मागील पारंपरिक कलाकृतींची हत्या व्हावी म्हणून नवीन पद्धतीच्या कलाकृती जाणीवपूर्वक निर्माण केल्या जातात.

**भक्ती** : अनंत आहेत स्वतःला विसर्जित करण्याची तृष्णा म्हणजे भक्ती होय. स्वतःचा आहेनानुभव भोवतालच्या अनंत आहेत विसर्जित करण्याची आध्यात्मिक धडपड म्हणजे कलाकृती होय. हे अनंत आहे कधी समाजरूपी असते, कधी भाषा वगैरे माध्यमरूपी असते. अनेक कलावंतांना आपला आहेनानुभव समाजात विसर्जित करणे हे कर्तव्य वाटते. सामाजिक बांधिलकीची संकल्पना ह्यातूनच जन्मते. अनंत आहे आणि 'मी' यांच्यातील अद्वैत संपुष्टात आणणे म्हणजे भक्ती होय. कलाकृती हा असाच प्रयत्न असतो. समाज आणि मी यांच्यातील अद्वैत संपुष्टात आणण्याचा प्रयत्न म्हणूनही काही कलावंत कलाकृती निर्माण करतात. काही कलावंत अनंत आहेशी अद्वैत व्हावे म्हणून धडपडत असतात. त्यांची कविता ही त्यांच्या भक्तीचाच भाग असते. आपल्याकडील काही संत साहित्य हे ह्या तृष्णेतून जन्मलेले साहित्य आहे.

**आनंदसुख** : आहे हे आनंदरूपी आहे आणि म्हणूनच मितिकातील 'आहे', आनंदासाठी, अधिकाधिक आनंदासाठीच मितिकरूपात असते. तृष्णांच्या पूर्तीमागे हे 'आहे' लागले की ते आनंदाला पारखे होत जाते आणि मग आनंदाची आच हीच एक तृष्णा बनते. मानव मग जिथे जिथे आनंद मिळेल तिथे तिथे ज्या गोष्टीत आनंद मिळेल त्या त्या गोष्टी करायला लागतो. संभोग, खेळ आणि कलाकृतींची निर्मिती ह्यांच्यात हा आनंद असतो. कलावंताचा आनंद कलाकृतीबरोबर निर्माण होतो. ह्या आनंदासाठी आणि त्यातून मिळणाऱ्या सुखासाठी कलावंत कलाकृती निर्माण

करतो. प्रत्येकाची आनंदाची निजधामे वेगळी असतात आणि प्रत्येकजण ती शोधत असतो. कलावंत हा एक असा सुदैवी माणूस असतो, की ज्याला हे निजधाम सापडते (कित्येकांचे आयुष्य हे निजधाम शोधण्यातच वाया जाते). ह्या आनंदासाठी कलावंत कलाकृती निर्माण करतो व रसिक तिचा आस्वाद घेतो.

**करुणा** : सर्व तृष्णांचा निरास झाला की करुणा निर्माण होते. निर्वाणाला उपलब्ध झालेल्या व्यक्तीला आपला आनंद इतरांनाही वाटावा, त्यांनाही हा आनंद मिळावा असे करुणेच्या उदयानंतर वाटते आणि मग त्यासाठी काही वेळा ती कलाकृती निर्माण करते. इथे कसलीही तृष्णा असत नाही. आध्यात्मिक कलावंताची चर्चा करताना जे मुद्दे मांडलेत ते ह्या करुणेतून कलाकृती निर्माण करणाऱ्यांना लागू होतात. इथे त्याहून अधिक काही सांगण्याची आवश्यकता नाही असे वाटते.

वरील सर्व तृष्णा ह्या प्रत्येक स्त्रीपुरुषात आढळतात. त्यातील **सुरक्षितता**, **भक्ती**, **प्रीती**, **स्नेह**, आनंद, सुख ह्या तृष्णा स्त्रैण तृष्णा आहेत. ह्या तृष्णांचे प्रमाण ज्या जाणीवेत अधिक असते त्यांना **स्त्रैण** जाणीव म्हणतात. **संपादन**, **सत्ता**, हिंसा, **कायापालटी**, **काम** ह्या तृष्णा पुरुषी तृष्णा आहेत. ह्या तृष्णा ज्या जाणीवेत अधिक प्रमाणात असतात त्याला **पुरुष जाणीव** म्हणतात. **जिज्ञासा आणि आराम** ह्या तृष्णा अर्धनारीनटेश्वर तृष्णा आहेत. त्या दोन्ही जाणीवात समानच असतात. सर्वसाधारणतः स्त्रैण तृष्णा ह्या स्त्रियांच्यात तर पुरुष तृष्णा ह्या पुरुषांच्यात अधिक आढळतात. मातृसत्ताक पद्धतीत स्त्रैण तृष्णा ह्याच सामूहिक तृष्णा होत्या, तर पितृसत्ताक पद्धतीत पुरुष तृष्णा ह्या सामूहिक तृष्णा होत्या. आजचे जगातील बरेचसे प्रश्न हे पुरुष तृष्णांनी निर्माण केलेले प्रश्न आहेत. पुरुषी तृष्णांनी मिळवलेले वर्चस्व इतके आहे की स्त्रैण तृष्णांनीच निर्माण केलेल्या कामांना अत्यंत दुय्यम स्थान मिळालेले दिसते. उदा. सुरक्षितता ही स्त्रैण तृष्णा, देह टिकवण्यासाठी अन्न लागते, पण आज स्वैंपाक करणे हे काम अत्यंत दुय्यम समजले जाते. वास्तविक जगातील सर्वात महत्त्वाचे काम स्वैंपाक करणे आहे; पण टिकवण्यासाठी केली गेलेली कामे टिकाऊ नसल्याने (त्यांच्यातून टिकाऊ वस्तू निर्माण होत नाही) ह्या कामांचे महत्त्वच लक्षात येत नाही. किंवा रस्ते, घर टिकवण्यासाठी रस्त्यांची, घरांची स्वच्छता, टापटीप करावी लागते. घरातील वस्तू, रस्ते वगैरे टिकवण्यासाठी त्यांची काळजी घ्यावी लागते, सफाई करावी लागते. पण ही कामे दुय्यम बनतात. कारण त्यातून टिकाऊ वस्तू निर्माण होत नाहीत, तर वस्तू त्यातून टिकतात. जोपर्यंत वस्तूंना निर्माण करणारे श्रम आणि वस्तू टिकवणारे श्रम ह्यांना समान

मूल्य प्राप्त होत नाही तोपर्यंत समाज शहाणा झालाय असे म्हणण्यात अर्थ नाही. माझ्या मते **स्त्रीवादी चळवळ म्हणजे पुरुषी तृष्णांचे वर्चस्व नष्ट करून समाजात स्त्रैण तृष्णांची प्रतिष्ठापना करणे होय.** पर्यावरण टिकवणे हा त्यामुळेच स्त्रीवादी चळवळीचा एक मुख्य कार्यक्रम असला पाहिजे. स्त्रीपुरुष समानता म्हणजे स्त्रैण जाणीव आणि पुरुष जाणीव ह्या दोघांनाही समान दर्जा मिळणे होय. आज समाजात एखादा स्त्रैण जाणीवेचा पुरुष असेल तर त्यालाही समाज स्त्रीइतकाच वाईट वागणूक देतो. (कृपया स्त्रैण जाणिवेचा पुरुष म्हणजे हिजडा अशी गैरसमजूत करून घेऊ नये. हिजडा स्त्रैण जाणीवेचा असेलच ह्याची खात्री नाही) स्त्रीपुरुष समानता म्हणजे स्त्रैण तृष्णा व पुरुषी तृष्णा दोन्हींना योग्य तेच मूल्य देणे होय. आज स्त्रीवादी चळवळी ह्या पुरुषी तृष्णांना बळी पडून चालवल्या जात आहेत. ह्यातून अपयशाखेरीज हातात काहीच लागणार नाही. स्त्रीतृष्णांना प्रमाण मानून स्त्रीवादी चळवळ स्त्रैण पद्धतीनेच चालवायला हवी. आज ती पुरुषी पद्धतीनेच चालवली जात आहे. ह्यातून परिवर्तन शक्य नाही. कार्ल मार्क्सने स्त्रीवादी राज्य उभे करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांची मेथडॉलॉजी ही पुरुषी होती म्हणूनच नंतर पुरुषी तृष्णांनी डोके वर काढून ह्या चळवळीचा सत्यानाश केला. माझ्या मते जग स्त्रैण झाले तरच अधिक सुखी होईल. (दुःखापासून मुक्त होण्यासाठी मात्र सर्वच तृष्णांपासून मुक्त व्हायला हवे) पण स्त्रैण तृष्णांची प्रतिष्ठापना तथाकथित क्रांत्या करून होणार नाही, तर प्रत्येक व्यक्ती जागृत करून होईल. बुध्द, महावीर, कृष्णमूर्ती, रामकृष्ण परमहंस, गांधी इत्यादींची जी मेथडॉलॉजी होती ती स्त्रैण मेथडॉलॉजी होती. आपण तिचाच स्वीकार करायला हवा. स्त्रीची सर्वात मोठी ताकद म्हणजे अपत्याबाबत तिचा असणारा स्नेह, तिचे वात्सल्य. त्या आधारे प्रत्येक स्त्रीने आपल्या अपत्यात जरी स्त्रीतृष्णा वाढवल्या, पुरुषी तृष्णांच्या वर्चस्वाचा फोलपणा पटवून दिला तरी दोन-तीन पिढ्यात ह्या जगात समग्र परिवर्तन होईल. सतत रस्त्यावर आले म्हणजेच परिवर्तन होईल ही पुरुषी संकल्पना आहे. तिचा योग्य वेळी जरूर वापर करावा; पण आपली मेथडॉलॉजी ही स्त्रैणच असायला हवी. तिच्यात आक्रमण, संपादन, सत्ता नको तर प्रेम, स्नेह, भक्ती, आनंद, शांती असायला हवी. बुद्ध आणि अलीकडील कृष्णमूर्ती हे ह्या मेथडॉलॉजीचे उत्तम मॉडेल आहेत. गांधीची चळवळ ही तर एक उत्तम नमुना आहे. तेव्हा पाश्चात्य संस्कृतीचा पुरुषधार्जिणेपणा आपण स्वीकारायला पाहिजे असे नाही. संघर्ष हाच परिवर्तनाचा स्थायिभाव समजण्याचे कारण नाही. समायोजन हाही तितकाच महत्त्वाचा स्थायिभाव आहे.

सर्वसाधारणपणे स्त्री मध्ये स्त्रैण तृष्णा आधिक आढळतात. त्यामागे निसर्गाने तिची केलेली जडणघडण असावी. (काहींच्या मते ही पुरुषांनीच स्त्रीवर लादलेली मूल्ये आहेत. ही मते

बाळगणाऱ्या चळवळी स्त्रीला पुरुष बनवण्याचा मागे लागलेल्या दिसतात. हा खटाटोप व्यर्थ आहे हे भविष्यात कळेलच.) स्त्रीचे गर्भाशय आणि अपत्याला जन्म देण्याची तिची क्षमता ह्यामुळेच स्त्रैण तृष्णा तिच्यात अधिक आढळतात. अपत्यांची सुरक्षितता त्यांची काळजी ह्यामुळे सुरक्षितता ही तृष्णा तर संगोपनामुळे (संगोपनात स्त्रीचाच वाटा अधिक असतो) स्नेह ही तृष्णा स्त्रीत अधिक वाढलेली दिसते. (आई झाल्यावर स्त्रियांच्यात स्त्रैण तृष्णा अधिकच वाढतात) पुरुषाचा संभोग हा कामपिसाट असतो तर स्त्रीचा प्रेमपिसाट असतो. अनेकदा तर स्त्री संभोगात भक्तीपर्यंत सहज पोहचते. पुरुषाला मात्र संभोगातही आक्रमण, संपादन ह्यातून मुक्त होता येत नाही. त्यामुळेच लैगिंग संबंधातल्या राजकारणात पुरुषाचा सत्ता, संपादन ह्या तृष्णा कार्यरत असतात. तर स्त्रीच्या सुरक्षितता ही तृष्णा व ही सुरक्षितता नाहीशी होईल हे भय कार्यरत असते. अनेकदा धूर्त स्त्रिया भक्ती, प्रेम, स्नेह ह्या तृष्णांचा राजकारणी वापर करतात. पुरुष सत्ता आणि संपादनाचा वापर करतो. पुरुषात आक्रमणाचे बळ आधिक तर स्त्रीत टिकण्याचे, सोसण्याचे बळ आधिक असते. स्त्रैण आणि पुरुष जाणिवेतला हा फरक लक्षात न घेता स्त्रीवादाची मांडणी करणे हा वेडाचार आहे आणि आज अनेक स्त्रीवादी विचारवंत तो करत आहेत.

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट झालेली असेल. मानवात चार प्रकारची मितिके आढळतात.

(१) जिची जाणीव स्त्रैण आहे अशी स्त्री

(२) जिची जाणीव पुरुषी आहे अशी स्त्री

(३) ज्याची जाणीव स्त्रैण आहे असा पुरुष;

(४) ज्याची जाणीव पुरुषी आहे असा पुरुष.

कलावंताच्यातही त्यामुळे चार प्रकारचे कलावंत तयार होतात. कलाकृती या चार प्रकारच्या असू शकतात आणि कलाकृतीतील पात्रेही चार प्रकारची असतात.

**(१) स्त्रैण जाणीव असलेली स्त्री (स्त्रैण कलाकृती) :** दुर्गा भागवत, अनुराधा पाटील, प्रभा अत्रे, अमृता शेरगील, अपर्णा सेन हे कलावंत व ह्यांच्या कलाकृती

**(२) पुरुष जाणीव असलेली स्त्री (स्त्रैण कलाकृती) :** परवीन सुलताना, विजया मेहता, आयन रँड इ. कलावंत आणि ह्यांच्या कलाकृती

**(३) पुरुष जाणीव असलेला पुरुष (पुरुषी कलाकृती) :** दिलीप चित्रे, भालचंद्र नेमाडे, कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, पिकासो, हुसेन, सत्यजीत रे, ऋत्विक घटक आणि ह्यांच्या कलाकृती

**(४) स्त्रैण जाणीव असलेला पुरुष (पुरुषी कलाकृती)** : पु. शि. रेगे, ग्रेस, बालगंधर्वांचे गायन, गुल्जार (दिग्दर्शक) आणि ह्यांच्या कलाकृती

ह्याचा अर्थ असा नव्हे की, स्त्रैण जाणीव असलेली स्त्री फक्त स्त्रैण जाणीव असलेली स्त्रैण कलाकृतीच निर्माण करेल. कदाचित ती पुरुष जाणीव असलेली स्त्रैण कलाकृतीही निर्माण करू शकेल. तेव्हा ह्याबाबत आपण लवचिक भूमिका स्वीकारायला हवी. आज इतिहास लिहिताना आपण केवळ पुरुषी तृष्णांचा आणि त्यांनी केलेल्या कार्याचा विचार करतो. स्त्रैण तृष्णा आणि त्यांच्या कार्याचा विचार करत नाही. उदा. स्त्रीमुक्ती चळवळीचा इतिहास लिहिताना पुरुषांच्या सत्ता संपादन (आक्रमण) वगैरे तृष्णांचा विचार होतो, पण स्त्रियांनी पुरुषप्रधान संस्कृतीतही सुरक्षितता, भक्ती, स्नेह वगैरे तृष्णांच्या साहाय्याने स्वत:ला कसे टिकवले ते मात्र आपण लक्षात घेत नाही. त्यामुळे इतिहासाचे आपले आकलन एकांगी बनते. वाङ्:मयाचा इतिहास ह्याला अपवाद नाही. मर्ढेकरांच्यावर टी. एस. इलियटचे असलेले आक्रमण संपादन आपण ताबडतोब स्वीकारतो, पण मर्ढेकरांनी अभंगातून जे मराठीपण टिकवले त्याचा फारसा विचार आपण करत नाही. त्यामुळेच आपले आंतरराष्ट्रीयत्वाचे आकलन हे उथळ आणि फोफसे असते. केशवसुत हा कवी फालतू ठरतो, त्याचे कारण त्यांनी टिकवण्यासाठी काहीच केलेले नसते, कारण आक्रमणाचा, संपादनामागचा व्यापक आशयच त्यांना कळलेला नसतो. हे लोक केवळ परदेशी आशयाचे स्वदेशी भाषांतर करून मोठे कवी बनतात. मर्ढेकरांची टिकण्याची तृष्णा क्षीण दिसते; पण त्यांच्यात ती आहे. पु. शि. रेगे हे मूलत: स्त्रैण जाणिवेचे असल्याने त्यांनी मात्र टिकवण्याची कामगिरी व जबाबदारी आतून पार पाडलेली दिसते. त्यामुळेच काळाप्रमाणे मर्ढेकरांचा प्रभाव कमी होत चालला आहे, तर रेगेंचा वाढतच चालला आहे; कारण टी. एस. इलियट, हॉपकिन्स वाचल्यानंतर मर्ढेकरांचे फारसे आकर्षण उरत नाही. त्याउलट रेगे जे अनुभवविश्व देतात ते पाश्चात्त्य कवी देऊच शकत नाहीत. **डी. एच. लॉरेन्स** हा स्त्रैण कादंबरीकारही (तो कादंबरीकार म्हणून रेग्यांपेक्षा श्रेष्ठ तर कवी म्हणून कनिष्ठ वाटतो) रेग्यांचे आकर्षण कमी करू शकत नाही. माझ्या मते मराठी वाङ्:मयाचा इतिहास लिहिताना रोमॅण्टिक नवतेत केशवसुत, गोविंदाग्रज वगैरे कवी रद्दीत जमा करायला हवेत आणि फुले, पु. शि. रेगे, मनमोहन, ना. धों. महानोर हे केंद्रस्थानी यायला हवेत. कारण रेगे, महानोर हे कलोनियल आक्रमणापासून यथास्थित संरक्षण करतात, स्वत:ला टिकवतात. तर केशवसूत, गोविंदाग्रज या आक्रमणाला बळी पडतात. मर्ढेकर, करंदीकर हे पुढे असेच वसाहतवादाला पूर्णतः शरण जातात. फोफशी आंतरराष्ट्रीयता जोपासतात. तर नेमाडे, चित्रे हे पुन्हा स्वत:ला टिकवतात. देशीवाद हा एका अर्थाने स्त्रैण तृष्णांचा आविष्कार आहे असे म्हणायला

हरकत नाही. त्यामुळेच पु. शि. रेगे, ना. धों. महानोर हे रोमँण्टिक असूनही देशीवाचांना आपलेसे वाटतात तर करंदीकर, सदानंद रेगे हे आधुनिक असूनही आपलेसे वाटत नाहीत. असो. एक गोष्ट इथे लक्षात घ्यायला हवी की, ज्या तृष्णांच्या पूर्तीसाठी कलावंत कलाकृती निर्माण करतो त्याच तृष्णांच्या पूर्तीसाठी रसिकही कलाकृती आस्वादतो. कलावंताचे जसे चार प्रकार असतात तसेच रसिकांचेही चार प्रकार असतात. त्यामुळेच ग्रेसला त्याचे रसिक मिळतात तर नेमाडेंना त्यांचे रसिक मिळतात. वाचक मात्र सर्वांनाच मिळतात.

मागे चर्चा करताना आपण समाज म्हणजे असंख्य कळपांची गर्दी असे म्हटले होते. आधुनिक समाजात ह्या कळपांचे सर्वात छोटे एकक असते कुटुंब. सर्वसाधारणपणे लहान मुलांचे संगोपन आणि वृद्धांचा सांभाळ ह्या दोन्ही जबाबदाऱ्या पूर्वी कळप पार पाडायचा. आधुनिक काळात कळपाचे सर्वात छोटे युनिट कुटुंब असल्याने ह्या दोन्ही जबाबदाऱ्या कुटुंबावर पडतात. अलीकडे ह्या दोन्ही जबाबदाऱ्या नाकारू इच्छिणारे काही तथाकथित आधुनिक कौटुंबिक विचारवंत आलेत. त्यांना हे सत्य सांगायलाच हवे की, सामूहिक तृष्णांची पूर्ती करणारा सर्वात छोटा कळप म्हणजे कुटुंब आणि संगोपन आणि वृद्धांचा सांभाळ ह्या दोन्ही जबाबदाऱ्या कुटुंबाच्याच आहेत आणि कुटुंबाने त्या पार पाडल्या पाहिजेतच. एखाद्या माणसाला कुटुंब नसेल तर समाजाने ही जबाबदारी स्वीकारलीच पाहिजे. तुम्ही एकीकडे जुने कळप नष्ट करून ठेवलेले, त्याजागी नवीन पद्धतीची कळपांची रचना अस्तित्वात आणलीय, तर तुमची कळपाची जबाबदारी तुम्हाला झटकता येणार नाही. ते अनैसर्गिक व अघोरी कृत्य आहे. पूर्वी म्हाताऱ्या माणसाच्या शहाणपणाचा व अनुभवाचा फायदा ज्ञानाची गती फार मंद असल्याने हमखास व्हायचा. त्यामुळे बुढे लोक आऊट डेट व्हायचे नाहीत. हल्ली ज्ञानाचा स्फोट झाल्याने म्हातारे लोक ताबडतोब आऊट ऑफ डेट होतात. त्यामुळे आपण अनेकदा म्हाताऱ्यांची उपयुक्तता संपुष्टात आल्याने त्यांना वृद्धाश्रमात टाकायला निघतो. माझ्या मते ह्यावर उत्तम उपाय म्हणजे संगोपनाची जबाबदारी वृद्धांच्यावर टाकावी. त्यामुळे ते निरुपयोगी होणार नाहीत आणि तारुण्याचा वेळ वाचेल. त्यासाठीच समाजात वृद्धाश्रम आणि बालसंगोपनगृहे एकत्र असायला हवीत; पण आपण ही साधी गोष्ट नीट करत नाही. वास्तविक नात, नातू आणि आजोबा-आजी, अनाथ-नात, नातू आणि अनाथ आजोबा-आजी हे दोघे अतिशय उत्तम तऱ्हेने एकत्र जाऊ शकतात. कलावंताचा समाजाकडे पाहाण्याचा दृष्टिकोन हा तो कुटुंबसंस्थेकडे कसा पाहातो त्यावर अवलंबून असतो. म्हणून कलावंताने कळपाचे सर्वात छोटे युनिट म्हणून कुटुंबाकडे नीट पाहाणे आवश्यक आहे. वाङ्‌मयाचा इतिहास हा एका अर्थाने कुटुंबसंस्थेचा इतिहास आहे हे लक्षात घेतले पाहिजे. जेव्हा आईबाप आपल्या तृष्णांची

पूर्ती कर म्हणून मुलावर सक्ती करत असतात तेव्हा अनेकदा ते सामूहिक तृष्णा मुलावर लादत असतात हे लक्षात घेतले पाहिजे. सामूहिक तृष्णाच कुटुंबसंस्थेच्या पातळीवर आपले कार्य करताना दिसत असतात. आज जर मराठी कुटुंबांची मुले इंग्रजी माध्यमात शिकत असतील तर त्याचा अर्थच असा की, इंग्रजी माध्यमात शिकण्याची तृष्णा ही आता सामूहिक तृष्णा बनत चालली आहे. थोडक्यात, लेखकाचे कळपाविषयीचे भान हे त्यांच्या कौटुंबिक भानातून व्यक्त होत असते. एखादा नायक जर कुटुंबाविरुद्ध बंड करत असेल तर त्याचा अर्थ अनेकदा तो समाजाविरुध्द बंड करत आहे असा होतो. पांडुरंग सांगवीकर काय, किंवा अनिरुध्द धोपेश्वरकर काय दोघांचीही वरकरणी कुटुंबाविरुध्द असणारी बंडे साक्षात समाजाविरुद्ध आहेत.

प्रत्येक तृष्णेकडे सर्वसाधारणपणे तीन प्रकारचे गुणधर्म असतात. ह्या गुणधर्मातून मितिकाचे आकारिक गुणधर्म जन्मतात.

(१) द्रव्यीक (Matternal)

(२) शाक्त (Energetic)

(३) गतिक (Velocitical)

ह्याच तृष्णांनी मितिके व्याप्त असल्याने त्यांच्या ठायी हे गुणधर्म आढळतात. त्यामुळे प्रत्येक व्यक्तीत वरील प्रकारचे गुणधर्म आढळतात. हे गुणधर्म पुढीलप्रमाणे मांडता येतील. ह्यातून आकारिक गुणधर्म अस्तित्वात येतात

| द्रव्यीक | शाक्त | गतिक | आकारिक |
|---|---|---|---|
| व्याप्ती | कायापालटी | वेगता | समतोलपणा |
| सूक्ष्मता | (कायापालट करण्याची शक्ती) | गतिशीलता | प्रमाणबध्दता |
| स्थूलता | पीळ . | स्थितिशीलता | आयामता |
| क्षेत्रविस्तार | ठोसपणा | धार | विविधता |
| | दृढता | तरलता | औचित्य |
| | बलवत्ता | लवचिकपणा | अचूकता |
| | वजन | वारंवारता | समायोजकता |
| | | | ज्ञातंता |
| | | | जटिलता |
| | | | स्पष्टता |

द्रव्यच आकार धारण करत असल्याने द्रव्यीक गुणधर्म व आकारिक गुणधर्म जवळ जवळ एकच वाटतात.

कलाकृती हीही मितिकच असल्याने तिच्यातही वरील सर्व गुणधर्म आढळतात. त्यामुळे कलावंतात जे गुणधर्म असतात, तेच कलाकृतीतही आढळतात. मात्र कलावंतात जे असतात ते सारेच कलाकृतीत आढळतातच असे नाही. उदा. नेमाडेंची कायापालट करण्याची शक्ती अफाट होती. ती कोसलात जशी आली तशी नंतरच्या कादंबरीत आली नाही. त्याउलट कोसलात स्त्रीचित्रणात वजन नाही, ठोसपणा नाही, बिढारमध्ये तो वाढलेला दिसतो. स्त्रीव्यक्तिमत्त्वाच्या गतिक गुणधर्माचा कोसलात नेमाडेंना पत्ताच नाही. स्त्रीचे अत्यंत स्थितिशील आणि स्थूल चित्रण आढळते. बिढारमधील पारूच्या चित्रणात मात्र नेमाडेंना स्त्रीची गतिकता सापडलेली दिसते. मात्र खुद्द नायकच ह्या गतिकतेपुढे अगतिक झालेला दिसतो. ह्या गतिकतेची सूक्ष्म वाढ मात्र नंतर जरीला व झूलमध्ये दिसत नाही. चित्रेच्यांत ही सूक्ष्म वाढ आढळते. मात्र चित्रेंच्या स्त्रीचित्रणातील सर्वांत मोठा दोष म्हणजे ते आकारिक आहे आणि हा आकार केवळ शारीरिक आहे.

मितिकात तृष्णा आढळतात. अनेक मितिकांत स्मृतिकेंद्रे अस्तित्वात असतात. मानवात ही स्मृतिकेंद्रे सर्वांत जास्त आढळतात. तृष्णांच्या पूर्तीसाठीच ती जन्मतात आणि वाढतात. ह्या स्मृतिकेंद्रातील स्मृती (ही स्मृतिकेंद्रे सर्व मितिकभर असतात. प्रत्येक पेशीला स्मृतिकेंद्र असते) आणि तृष्णा ह्यांचा संघात म्हणजे **मन** होय. स्मृति आणि तृष्णा ह्यांच्यातील क्रिया म्हणजे **भाव** होय. म्हणूनच मन हे भावूकच असते. विज्ञानात भाव वगळूनच निरीक्षणे नोंदवावी लागतात, करावी लागतात. त्यामुळेच ते निर्भावात्मक राहू शकते. ह्याउलट कलावंताला तृष्णांचाच विचार करावा लागतो. म्हणूनच त्याची व्यवस्था भावात्मक असते. तृष्णेचे वस्तुनिष्ठ चित्रण हेही तृष्णेचेच चित्रण असते. मानव्यविज्ञानात त्यांचे निरीक्षण व परीक्षण असते. कलेत तृष्णा, मितिके निर्माण करावी लागतात, वाढवावी लागतात. म्हणूनच कलेत भाव महत्त्वाचे ठरतात. ह्या भावांची यादी मागे दिलेली आहेच. त्यांचे विवेचनही मागे केले आहे. हे भावही वरील गुणधर्मांनी युक्त असतात.

कलाकृतीत आहेनानुभावाचे सभावात्मक चित्रण चार प्रकारांनी होते. आहे क्रियाशील असते त्याला आहेन म्हणता येईल आहेनचा अनुभव म्हणजे आहेनानुभव होय.

**(१) आत्मवादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन :** इथे आहेनानुभव जसा येतो तसाच कलामाध्यमात रूपांतरित केला जातो.

**(२) वास्तववादी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन :** इथे आहेनानुभव जसा आहे तसा कलामाध्यमात रूपांतरित केला जातो.

**(३) आत्मवादी आत्मनिष्ठ दृष्टिकोन :** इथे आहेनानुभव रूपांतरित करताना त्याचा वास्तवात शक्य नसलेला कायापालट केला जातो.

**(४) वास्तववादी आत्मनिष्ठ दृष्टिकोन :** इथे आहेनानुभव कलामाध्यमात रूपांतरित करताना त्या आहेनानुभवाचा वास्तवात शक्य असलेला कायापालट केला जातो.

हे चार दृष्टिकोन आहेनानुभवाचे कलानुभवात रूपांतरित करताना कलावंताजवळ असतात. प्रत्येक कलावंत त्यांचा स्वत:च्या आवडीनुसार व कुवतीनुसार वापर करत असतो.

